**अस्थायी पदांना मुदतवाढ/सेवासातत्य.......**

**अधीक्षक अभियंता, कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे यांचे अधिपत्याखालील वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, कोथरुड, पुणे.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : अस्थायी-२०२३/प्रक्र.२९/ निवसं-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ एप्रिल, २०२३.

**संदर्भ:** १) जलसंपदा विभाग, शा.नि.क्र.पीएलएन-२०२२/प्रक्र-५५/निवसं-१, दि.१०.१०.२०२२.
२) वित्त विभाग, शा.नि.क्र.पदनि-२०१६/प्रक्र-०८/१६/आ.पु.क., दि.८.२.२०२३.
३) जलसंपदा विभाग, शासन पत्र क्र.आढावा २०२३/प्र.क्र.१३/आ.(पुनर्रचना), दि.२०.०२.२०२३.
४) उप अधीक्षक अभियंता, कुकडी सिंचन मंडळ, पुणे यांचे पत्र क्रमांक कुसिंमं/पशा/आ-५/१००६/सन २०२३, दि.२.३.२०२३.
५) कार्यकारी अभियंता, वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, पुणे यांचे पत्र क्र.वेसिंलविय/आस्था/११५/सन २३ दि.५.४.२०२३

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय दिनांक १८.११.२००८ अन्वये कार्यकारी अभियंता, वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, पुणे साठी महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या कार्यालयातील व जलसंपदा विभागाच्या आढाव्याअंती अतिरिक्त ठरलेल्या आस्थापनेतून अंतर्गत फिरवाफिरवीने १३ पदे मंजूर करण्यात आलेली आहेत. त्याचप्रमाणे शासन निर्णय दिनांक ०१.०८.२००९ अन्वये अतिरिक्त ४ पदे उपलब्ध करुन देण्यात आली आहेत. त्यामुळे सदर पथकासाठी एकूण १७ पदे मंजूर करण्यात आली आहेत. सदर पदे विविध आस्थापनांवरुन उपलब्ध करुन दिलेली आहेत. सदर पदांना संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये दि.२८.२.२०२३ पर्यंत सेवासातत्य मंजूरी प्रदान करण्यात आली आहे. सदर पदांना दिनांक ०१ मार्च, २०२३ पासून दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ पर्यंत सेवासातत्य मंजूरी प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मुख्य अभियंता, (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील अधीक्षक अभियंता, कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे यांचे अधिपत्याखालील कार्यकारी अभियंता, वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, पुणे यांच्या नियत अस्थायी आस्थापनेवरील सोबतच्या विवरणपत्रातील १७ पदांना खालील अटींच्या अधिन राहून दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ पर्यत सेवा सातत्य चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

अ) नियत अस्थायी आस्थापनेवरील पदे ही दि.०६.०२.२००३ च्या शासन निर्णयान्वये मंजूर सुधारित आकृतीबंधानुसार ४५२९७ पदांच्या मर्यादेत आहेत.

नियत अस्थायी आस्थापनेवरील उपरोक्त पदांवर होणारा खर्च मागणी क्र. आय-५, ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०४) योजनेतर-वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान, (०४) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान, (४७०१ आय १६२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो २०२३-२४ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक पदनि-२०१६/प्रक्र-८/१६/आ.पु.क. दिनांक ८.२.२०२३ अन्वये प्रशासकीय विभागांस प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार, तसेच आ.(पुनर्रचना), जलसंपदा विभाग यांच्या क्र.आढावा २०२३/प्र.क्र.१३/आ.(पुनर्रचना), दि.२०.०२.२०२३ च्या पत्रानुसार व आ.(पुनर्रचना) कार्यासनाच्या अनौ.सं.क्र.६ दि.१७.४.२०२३ अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४१८१४४९३८१०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

PRASAD
RAMCHANDRA
NARVEKAR

Digitally signed by PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
DN: CN = PRASAD RAMCHANDRA NARVEKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.04.18 14:56:05 +05'30'

**(प्रसाद नार्वेकर)**
**मुख्य अभियंता तथा सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर

जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे,

अधीक्षक अभियंता, कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे.

कार्यकारी अभियंता, वेगवर्धीत सिंचन लाभ विशेष पथक, पुणे

**प्रत माहितीसाठी-**

मुख्य अभियंता, (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

कक्ष अधिकारी, मोप्र-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

कक्ष अधिकारी, आ. (पुनर्रचना)

**प्रत** : निवसं-१ (कार्यासन संग्रहार्थ)

# विवरणपत्र

जलसंपदा विभाग, शा.नि.क्रमांक : अस्थायी-२०२३/प्रक्र-२९/ निवसं-१
दिनांक : १८ एप्रिल, २०२३ चे सहपत्र
कुकडी प्रकल्प मंडळ अंतर्गत वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, पुणे अंतर्गत नियत अस्थायी आस्थापना

| **अ. क्र.** | **पदनाम** | **पदसंख्या** |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | कार्यकारी अभियंता | १ |
| २ | उपविभागीय अभियंता | २ |
| ३ | सहा. अभियंता श्रे.२/ शाखा अभियंता | ६ |
| ४ | अनुरेखक | १ |
| ५ | लघुटंकलेखक | १ |
| ६ | वरिष्ठ लिपीक | १ |
| ७ | कनिष्ठ लिपीक (लिपिक/टंकलेखक) | १ |
| ८ | वाहन चालक | १ |
| ९ | शिपाई | ३ |
| | **एकूण** | **१७** |

PRASAD RAMCHANDRA NARVEKAR

Digitally signed by PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
DN: CN = PRASAD RAMCHANDRA NARVEKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.04.18 14:56:19 +05'30'

**(प्रसाद नार्वेकर)**
**मुख्य अभियंता तथा सह सचिव**
**महाराष्ट्र शासन**